**सन २०१७-१८ करीता विशेष केंद्रीय सहाय्य योजनेअंतर्गत मंजूर Creating a Diploma Course in Sustainable Management of MFPs under FRA & PESA या योजनेच्या मार्गदर्शक तत्वांना मंजूरी देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः केंद्रीय-२०१७/प्र.क्र.६८/का-१९

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: २९/०८/२०१७

**वाचा-**

१. जनजाती कार्य मंत्रालय,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.F.No.११०१५/०५/२०१७-TSP, दि.३०/०५/२०१७
२. शासन निर्णय क्रमांकः केंद्रिय-२०१७/प्र.क्र.४५/का.-१९, दि. १९/०८/२०१७

**प्रस्तावना -**

विशेष केंद्रीय सहाय्य योजनेअंतर्गत सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाकरीता केंद्र शासनाने रु. १२८१०.३८ लक्ष निधीच्या एकुण २८ प्रस्तावांना वाचा क्र. १ वरील पत्रान्वये मान्यता प्रदान केली आहे. या योजनेअंर्तगत केंद्र शासनाने Creating a Diploma Course in Sustainable Management of MFPs under FRA & PESA या योजनेच्या एकुण रु. २१५.०० लक्ष किंमतीच्या प्रस्तावास मंजूरी प्रदान केली आहे. आदिवासी विकास विभाग व मुंबई अर्थशास्त्र आणि सार्वजनिक धोरण संस्था ह्याच्या मध्ये महाराष्ट्र राज्यातील आदिवासी विकास संबंधीत विविध बाबींवर संशोधन आणि धोरण आखणी बाबत सामंजस्य करार झाला आहे. सदर कराराच्या अधीन वन हक्क कायदा (२००६) आणि पेसा कायदा २०१२ ह्या कायद्यांखाली राज्यातील ५,००० पेक्षा अधिक ग्रामसभांना सामूहिक वन हक्क प्राप्त झालेले आहेत. सदर हक्कांची प्रभावीपणे अंमलबजावणी करता यावी ह्या साठी प्रशिक्षण आणि क्षमता निर्मितीची आवश्यकता असल्याने उपरोक्त योजनांकरीता वाचा क्र. २ वरील शासन निर्णयान्वये वितरीत निधीतून Creating a Diploma Course in Sustainable Management of MFPs under FRA & PESA योजनेच्या मार्गदर्शक सूचनांना मंजूरी देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

या निर्णयाद्वारे सोबत जोडलेल्या परिशिष्ट क्रमांक १ नुसार Creating a Diploma Course in Sustainable Management of MFPs under FRA & PESA योजनेच्या एकुण रु. २१५.०० लक्ष किंमतीच्या अंमलबजावणीच्या मार्गदर्शक सूचनांना मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

सदर मार्गदर्शक सूचनांनुसार वितरीत तरतूदींच्या मर्यादेत योजना राबविण्याबाबत त्वरीत कार्यवाही करण्यात यावी व त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक व भौतिक अहवालासह शासनास सादर करण्याची दक्षता घ्यावी.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८३१११४१९३३२७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil Yuvagaunda Patil

Digitally signed by Sunil Yuvagaunda Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=242a9d4c980f22d1ebad86187039dae244ea2a9a89754cff19bc6510261eccdd, cn=Sunil Yuvagaunda Patil
Date: 2017.08.31 14:10:22 +05'30'

(सुनिल पाटील)
सह सचिव

**प्रत,**

१. मा.मंत्री आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय,मुंबई
२. मा.राज्यमंत्री आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. स्वीय सहायक,मा. सचिव,आदिवासी विकास,मंत्रालय,मुंबई
४. आयुक्त,आदिवासी विकास,महाराष्ट्र राज्य,नाशिक.
५. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
६. सहसचिव,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
७. उपसचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, गडचिरोली.
९. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, चंद्रपूर.
१०.प्रा. नीरज हातेकर, संचालक , मुंबई अर्थशास्त्र आणि सार्वजनिक धोरण संस्था, मुंबई.
११.प्रा. अभय मोरेश्वर पेठे, प्राध्यापक, मुंबई अर्थशास्त्र आणि सार्वजनिक धोरण संस्था, मुंबई.
१२.प्रा विनायक देशपांडे, प्राध्यापक, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर.
१३.डॉ. मनीषा करणे, मुंबई अर्थशास्त्र आणि सार्वजनिक धोरण संस्था, मुंबई.
१४.संगणक समन्वयक,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
१५.निवड नस्ती (का.१९) आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.

# विशेष केंद्रीय सहाय्य योजना-सन २०१७-१८
## परिशिष्ट क्र.१

| | | |
|---|---|---|
| १ | योजनेचे नांव - | Creating a Diploma Course in Sustainable Management of MFPs under FRA & PESA |
| २ | लाभार्थी/ युनिट संख्या. | वन हक्क कायद्यांतर्गत लाभ मिळालेल्या ५७०० ग्रामसभा |
| ३ | योजनेचे प्रस्तावित लाभ क्षेत्र | राज्यातील वन हक्क कायद्यांतर्गत लाभ दिलेले व पेसा कायद्यांतर्गत असलेले क्षेत्र |
| ४ | वित्तीय तरतूद | सन २०१७-१८ करीता विशेष केंद्रीय सहाय्य योजने अंतर्गत मंजूर रु.२१५.०० लक्ष निधी सदर योजनेकरीता उपलब्ध करून द्यावा. |
| ५ | योजनेसाठी येणा-या खर्चाचे सविस्तर अंदाजपत्रक | (तक्ता खाली) |

| बाब | एकूण खर्च (रु.लक्ष) |
|---|---|
| अभ्यासक्रम निश्चित करण्यासाठी कार्यशाळा | १०.०० |
| अभ्यासक्रम निर्मिती साठी तज्ञांचा मोबदला | १०.०० |
| प्रशिक्षकांचा मोबदला | १००.०० |
| कार्यालयीन कामकाजासाठी आवश्यक कंत्राटी व्यक्तींचा मोबदला | १०.०० |
| अभ्यासक्रम निश्चिती साठी लागणारा संशोधन खर्च | ३०.०० |
| संस्थात्मक खर्च | १८.०० |
| प्रवास खर्च | ३०.०० |
| संगणक खरेदी | ७.०० |
| एकूण खर्च | २१५.०० |

| | | |
|---|---|---|
| ६ | योजना राबविणारी यंत्रणा | आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे व मुंबई अर्थशास्त्र व सार्वजनिक धोरण संस्था, मुंबई विद्यापिठ |
| ७ | नियंत्रक अधिकारी | आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे |
| ८ | योजनेचा उद्देश | वन हक्क कायदा (२००६) आणि पेसा कायदा २०१२ ह्या कायद्यांखाली राज्यातील ५,००० पेक्षा अधिक ग्रामसभांना सामूहिक वन हक्क प्राप्त झालेले आहेत. सदर हक्कांची प्रभावीपणे अंमलबजावणी करता यावी ह्या साठी प्रशिक्षण आणि क्षमता निर्मितीची आवश्यकता आहे. सदर योजनेद्वारा सामूहिक वन व्यवस्थापनाचा पदविका कार्यक्रम निर्माण करून राबविण्यात येणार आहे. |
| ९ | योजना अंमलबजावणीची कार्यपद्धती | १. आदिवासी विकास विभाग व मुंबई अर्थशास्त्र आणि सार्वजनिक धोरण संस्था ह्याच्या मध्ये महाराष्ट्र राज्यातील आदिवासी विकास संबंधीत विविध बाबींवर संशोधन आणि धोरण आखणी बाबत सामंजस्य करार झाला आहे.<br>२. सदर कराराच्या अधीन राहून मुंबई अर्थशास्त्र आणि सार्वजनिक धोरण संस्था, मुंबई विद्यापीठ, ह्याच्या मार्फत, राज्यातील इतर विद्यापीठांच्या |

| | | |
|---|---|---|
| | | सहकार्याने "सामूहिक वन व्यवस्थापन " पदविका राबविण्यात येणार आहे. हि योजना तीन टप्प्यात राबविण्यात येणार आहे.<br>➢ पहिल्या टप्प्यात तज्ञांच्या मदतीने पदविकेचा अभ्यासक्रम निश्चित करून गोंडवाना विद्यापीठ गडचिरोली, आणि श्री संत गाड्गेबाबा अमरावती विद्यापीठ ह्यांच्या सहकार्याने १०० मास्टर ट्रेनरना पदविका प्रशिक्षण दिले जाईल.<br>➢ दुसऱ्या टप्प्यात मास्टर ट्रेनर कडून गडचिरोली, गोंदिया, आणि चंद्रपूर ह्या जिल्ह्यातील ग्रामसभेच्या सदस्यांसाठी पदविका प्रशिक्षण दिले जाईल.<br>➢ तिसऱ्या टप्प्यात पदविका कार्यक्रम राज्यातील इतर विद्यापीठांच्या कक्षेत मुंबई अर्थशास्त्र आणि सार्वजनिक धोरण संस्थेच्या संयुक्त विद्यमाने राबविला जाईल. |
| १० | निधी वितरणाचे टप्पे | १. अंमलबजावणी संस्थेस म्हणजेच मुंबई अर्थशास्त्र व सार्वजनिक धोरण संस्था, मुंबई विद्यापिठ यांना योजना अंमलबजावणीच्या सुरवातीस प्रथम टप्प्याचा खर्च म्हणून रु. ६० लक्ष निधी वर्ग करावा.<br>२.प्रथम टप्प्याचा निधी वितरीत केल्यावर दोन महिन्यांनी सुकाणू समिती मार्फत झालेल्या कामाचे आढावा घेण्यात यावा.<br>३.तद्नंतर दर दोन महिन्यांनी सुकाणू समितीची बैठक होऊन सुकाणू समितीच्या सूचनेप्रमाणे उर्वरीत निधी वितरीत करण्यात यावा. |
| ११ | योजनेच्या अटी व शर्ती | १. सामूहिक वन व्यवस्थापन पदविका अभ्यासक्रम निश्चित करताना संबंधीत विषयांच्या तज्ञाची मदत आदिवासी विकास विभाग , महाराष्ट्र राज्य ह्यांच्या सल्ल्यानुसार घेण्यात येईल.<br>२. सामुहिक वन व्यवस्थापन पदविका ह्या अभ्यासक्रमाला मान्यता मिळावी ह्या साठी आवश्यक असलेल्या बाबींची पूर्तता मुंबई अर्थशास्त्र आणि सार्वजनिक धोरण संस्था करेल.<br>३..सामुहिक वन व्यवस्थापन पदविका इतर विद्यापीठांच्या कार्यक्षेत्रात राबविण्यासाठी महाराष्ट्र विद्यापीठ कायदा २०१६ नुसार आवश्यक असलेल्या सर्व बाबींची पूर्तता मुंबई अर्थशास्त्र आणि सार्वजनिक धोरण संस्था करेल.<br>४. सदर काम मुंबई अर्थशास्त्र व सार्वजनिक धोरण संस्था, मुंबई विद्यापिठ यांचे मार्फत विहीत कालावधीमध्ये पुर्ण करून घेण्याची जबाबदारी आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांची राहील.<br>५. सदर योजनेच्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र विहीत नमुन्यात मुंबई अर्थशास्त्र आणि सार्वजनिक धोरण संस्था यांनी आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांना सादर करावे.<br>६. सदर योजनेचा वेळोवेळी प्रगती अहवाल योजना पुर्ण झाल्यानंतर छायाचित्रण, रिपोर्ट यासह सादर करावा. |

| | | |
|---|---|---|
| | | ७. योजनेच्या अंमलबजावणीमध्ये क्षेत्रीय कार्यालयास काही अडचण निर्माण झाल्यास योजना अंमलबजावणीच्या कार्यपध्दतीत बदल करण्याचा अधिकार सुकाणू समितीस राहील. |
| १२ | योजनेचा कालावधी | १ सप्टेंबर २०१७ ते ३१ मार्च २०१९ |
| १३ | योजनचे संनियंत्रण व मुल्यमापन पर्यवेक्षण | ➢ सदर योजनेचे मुल्यामापन व सनियंत्रण करण्यासाठी पुढीलप्रमाणे सुकाणू समिती गठित करण्यात येत आहे.<br>१ अ.मु.स./ प्र.स./सचिव, आदिवासी विकास - अध्यक्ष<br>२ आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे -सदस्य सचिव<br>३ कुलगुरू, संत गाडगेबाबा अमरावती विद्यापिठ/ नामानिर्देशीत सदस्य -सदस्य<br>४ कुलगुरू, गोंडवाना विद्यापिठ, गडचिरोली/ नामानिर्देशीत सदस्य -सदस्य<br>५ उपसचिव, राज्यपाल भवन, आदिवासी कक्ष -सदस्य<br>६ प्रा. नीरज हातेकर, संचालक , मुंबई अर्थशास्त्र आणि सार्वजनिक धोरण संस्था -सदस्य<br>७ प्रा. अभय मोरेश्वर पेठे, प्राध्यापक, मुंबई अर्थशास्त्र आणि सार्वजनिक धोरण संस्था -सदस्य<br>८ प्रा विनायक देशपांडे, प्राध्यापक, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ -सदस्य<br>९ डॉ. मनीषा करणे, मुंबई अर्थशास्त्र आणि सार्वजनिक धोरण संस्था -सदस्य<br>१० संबधित सह/उपसचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई. -सदस्य<br>११ अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर /नामनिर्देशित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प -सदस्य<br>१२ अपर आयुक्त, आदिवासी विकास, अमरावती /नामनिर्देशित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प -सदस्य<br>➢ उपरोक्त समितीद्वारे मुंबई अर्थशास्त्र आणि सार्वजनिक धोरण संस्थेमार्फत योजनेच्या कालावधीत झालेल्या कामाचे मूल्यमापन दर दोन महिन्यांनी करण्यात येईल.<br>➢ उपरोक्त समिती मुल्यामापन व सनियंत्रणाशिवाय सदर काम करताना अंमलबजवणी यंत्रणेस काही अडचणी आल्यास त्याबाबत आवश्यक मार्गदर्शन करून काम पुर्ण करून घेईल. |